**भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षाकरीता शाळेची निवड करण्याबाबत**

**जीवनज्योत सामाजिक संस्था, आष्टी (तांडा), ता. हदगाव, जि. नांदेड संचलित विमल इंग्लिश स्कुल, भोकर, ता. भोकर, जि. नांदेड**

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: धइशा-२०२३/प्र.क्र.२४७/योजना-२**

३ रा मजला, नवीन प्रशासन भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक- १४ मार्च, २०२४.

**वाचा :** १) शासन निर्णय विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,क्र. धइशाप्र-२०१९/ प्र.क्र.७२/ शिक्षण, दिनांक ४/९/२०१९.

२) सहायक आयुक्त, समाजकल्याण, नांदेड यांचे पत्र क्र.सआसकना/कार्य ६(१)/धसशा/ विमल इ.स्कुल/विद्यार्थी प्रस्ताव/२०२३/३५००, दि.१/६/२०२३

३) प्रादशिक उपसंचालक,इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक विभाग), लातूर यांचे पत्र क्र.प्राउइमाबकलातूर/धनगर समाज नामांकित इंग्रजी शाळा प्रस्ताव/२०२३-२४/१३३४, दि. ५/६/२०२३

४)संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, म.रा., पुणे यांचे पत्र क्र.इमावबकसं/ धर्म रहाटे/बुल/२०२३-२४/पुणे/१३०७, दि. ७/६/२०२३

५) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र.धइशाप्र-२०२१/प्र.क्र.९५/योजना-२ दि.५/३/२०२४

**प्रस्तावना : -**

धनगर समाजातील विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबतचा निर्णय संदर्भ क्र. १ येथील दि.४/९/२०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदींप्रमाणे जीवनज्योत सामाजिक संस्था, आष्टी (तांडा), ता. हदगाव, जि. नांदेड संचलित विमल इंग्लिश स्कुल, भोकर, ता. भोकर, जि. नांदेड या शाळेची निवड करुन सदरहू शाळेमध्ये भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थी प्रवेशास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव, तपासणी अहवाल व गुणांकन अहवालासह (एकूण गुणांकन ७१) संदर्भाधिन पत्रांन्वये शासनास प्राप्त झाला आहे. सदर योजनेंतर्गत मान्यता देण्यात आलेली दरवर्षी ५५०० विद्यार्थी संख्या वाढवून ती दरवर्षी १०००० करण्यास संदर्भाधिन क्र. ५ येथे नमूद दिनांक ५/३/२०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद ४ व ५ येथे नमुद अतिरिक्त निकषांची पूर्तता करण्याच्या अधिन राहून तसेच संबंधित शासन निर्णयातील अटी व शर्तीच्या अधिन राहून जीवनज्योत सामाजिक संस्था, आष्टी (तांडा), ता. हदगाव, जि. नांदेड संचलित विमल इंग्लिश स्कुल, भोकर, ता. भोकर, जि. नांदेड या शाळेची निवड करुन सदरहू शाळेला शैक्षणिक वर्ष २०२३-२४

करीता भटक्या जमाती-क प्रवर्गातील  धनगर समाजातील १०० विद्यार्थी प्रवेशित करण्यास शासनाची मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

'धनगर समाजातील विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे' या योजनेंतर्गत जीवनज्योत सामाजिक संस्था, आष्टी (तांडा), ता. हदगाव, जि. नांदेड संचलित विमल इंग्लिश स्कुल, भोकर, ता. भोकर, जि. नांदेड या शाळेची संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक ५/३/२०२४ मधील परिच्छेद ४ व ५ येथे नमुद अतिरिक्त निकषांची पूर्तता करण्याच्या अधिन राहून तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामधील अटी व शर्तीच्या अधिन  राहून निवड करण्यास व सदरहू शाळेला खालील तक्त्यात नमूदप्रमाणे  सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील १०० विद्यार्थ्यांना प्रवेशित करण्यास शासनाची  मान्यता देण्यात येत आहे.

| **संस्थेचे नाव** | **शाळेचे नाव** | सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षाकरीता  मान्य विदयार्थी संख्या |
|---|---|---|
| **२** | **३** | ४ |
| जीवनज्योत सामाजिक संस्था, आष्टी (तांडा), ता. हदगाव, जि. नांदेड | विमल इंग्लिश स्कुल, भोकर, ता. भोकर, जि. नांदेड | १०० |

१. नामांकित शाळेत प्रवेश देताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे :-

१. संबंधित संस्था/शाळेस शासन निर्णय दिनांक ४/९/२०१९ मधील अटी व शर्ती पुर्ण करणे आवश्यक राहील.
२. तसेच, सदर शाळेला संदर्भाधिन क्र. ५ येथील दि. ५/३/२०२४ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ४ व ५ येथे नमुद अतिरिक्त निकषांची पूर्तता करणे आवश्यक राहील.
३. सहाय्यक संचालक, इतर  मागास बहुजन  कल्याण विभाग, नांदेड यांनी नामांकित निवासी शाळा योजनेच्या अनुषंगाने  शाळेची तपासणी करावी  तसेच शाळेत प्रवेशित सर्व विदयार्थ्यांचे  आधारकार्ड पडताळणी  करुन नोंदणी करावी.  तद्नंतर प्रत्यक्ष उपस्थित लाभार्थी विदयार्थ्यांची संख्या व प्रत्यक्ष निवासी विदयार्थी संख्या याची खातरजमा करुन शासन निर्णय, दि.०४/०९/२०१९ मधील अटी-शर्तीनुसार सविस्तर अहवाल प्रादेशिक उपायुक्त, यांच्या मान्यतेने निधी वितरणासाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे मार्फत शासनास सादर करावा.
४. सदर योजनेंतर्गत विद्यार्थी मंजूरीबाबत संबंधित संस्था/शाळा मार्फत शासनास सादर प्रस्तावात नमूद सर्व सोयी सुविधा देण्यास संस्था तयार आहे, याची संबधित सहाय्यक संचालक, इतर  मागास बहुजन कल्याण विभाग यांनी खातरजमा करावी व संस्थेसोबत तसा करारनामा करण्यात यावा.
५. संस्था/शाळेमार्फत भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांसाठी वेगळी तुकडी/वर्ग सुरु करणे अपेक्षित नाही, शाळेमध्ये सुरु असलेल्या नियमित तुकडी/वर्गामध्येच इतर विद्यार्थ्यांसमवेत

योजनेंतर्गत प्रवेशित विद्यार्थ्यांना शिक्षण देणे बंधनकारक राहील.विद्यार्थ्यांसाठी वेगळी तुकडी/वर्ग सुरु केल्याचे आढळल्यास सदर संस्थेवर गुन्हा नोंदविण्याची कारवाई करण्यात येईल व शाळेची मान्यता तात्काळ रद्द करण्यात यईल.

६. संस्थेतील प्रवेशित मुलींच्या वसतिगृहात महिला अधिक्षिका व केअर टेकर यांची नियुक्ती करणे बंधनकारक आहे. याची पूर्तता न झाल्याचे आढळल्यास शाळेची मान्यता रद्द करण्यात येईल.

७. सदर योजनेंतर्गत शासनाने मान्यता दिलेल्या शाळांमध्येच आणि संबंधित शाळेकरिता मंजूर केलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेतच भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थी प्रवेशित करण्याबाबत संबंधित जिल्हयाचे सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांनी दक्षता घ्यावी.

८. योजनेच्या मूळ तरतुदीनुसार,कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रुपये १.०० लक्ष एवढया कमाल मर्यादेत असणाऱ्या पाल्यांनाच सदर योजनेचा लाभ देण्यात यावा.

९. संबंधित जिल्हयाचे सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांनी विद्यार्थी प्रवेशित करताना जवळच्या शाळेमध्ये तसेच संबंधित प्रकल्पातील निवड करण्यात आलेल्या शाळांना प्राधान्य देऊन विद्यार्थी प्रवेशाची प्रक्रिया तात्काळ पूर्ण करावी.

१०. एखाद्या प्रकल्प कार्यक्षेत्रातील निवड करण्यात आलेल्या शाळा व त्यामध्ये मंजूर विद्यार्थी संख्या यापेक्षा योजनेंतर्गत प्रवेशाकरिता प्राप्त अर्जांची संख्या जास्त असल्यास संबंधित जिल्हयाचे सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांनी विद्यार्थ्यांची निवड ड्रॉ पध्दतीने करुन निवड यादी जाहीर करावी. तसेच निवड न झालेल्या विद्यार्थ्यांची यादी प्रसिध्द करावी. प्रकल्पामधील निवड करण्यात आलेल्या शाळेमध्ये या विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात यावा.

१. सदर योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांच्या संस्थाचालक/मुख्याध्यापक यांच्या समवेत संबंधित जिल्हयाचे सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांनी शैक्षणिक वर्षाच्या प्रथम व द्वितीय सत्रामध्ये बैठक घेऊन प्रवेशित विद्यार्थ्यांची शैक्षणिक प्रगती व त्यांना पुरविण्यात येणाऱ्या सुविधांबाबत आढावा घ्यावा.

११. नामांकित योजनेंतर्गत शाळेची निवड झाल्यानंतर पहिल्या सत्रात दोन वेळा, तसेच द्वितीय सत्रात दोन वेळा संबंधित जिल्हयाचे सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांनी अचानक नामांकित शाळांना व्यक्तीश: भेट देऊन सदर शाळेमधील सौदार्हपुर्ण वातावरण, विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या सुविधा, औषधोपचार, शैक्षणिक दर्जा, पोषण इत्यादी सर्व बाबींबाबतचा अहवाल संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

१२. शासन निर्णय इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. धइशाप्र-२०१९/प्र.क्र.७२/शिक्षण, दिनांक ४/९/२०१९ मधील विहित तरतुदींचे काटेकोरपणे पालन करावे. सदर तरतुदींचे पालन न करणाऱ्या शाळांची मान्यता रद्द करण्यात येईल.

१३. नवीन विद्यार्थ्यांना इयत्ता १ ली ते ५ वी या इयत्तेमध्येच प्रवेश देण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

१४.(१४)सदर शासन निर्णयानुसार नामांकित योजनेंतर्गत मान्यता रद्द करण्यात आलेल्या शाळांमधील विद्यार्थी तसेच शासकीय इंग्रजी माध्यमाच्या श्रेणी वाढ नसलेल्या शाळांमधील विद्यार्थी तसेच शासकीय इंग्रजी माध्यमाच्या श्रेणीवाढ नसलेल्या शाळांमधील विद्यार्थ्यांना इतरत्र समायोजित करण्यात यावे,असे समायोजन संबंधित जिल्हयाचे सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांनी करावे व संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांच्यामार्फत अहवाल शासनास सादर करावा.

१५. नामांकित योजनेंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या नामांकित शाळेमध्ये विद्यार्थी प्रवेशित करताना ज्या इयत्तेत विद्यार्थी प्रवेशित करावयाचे आहेत. अशा इयत्तेत संबंधित शाळेमध्ये नामांकित योजने व्यतिरिक्त प्रवेशित इतर विद्यार्थीसंख्येच्या समप्रमाणाच्या कमाल मर्यादेत राहतील याची दक्षता घेण्यात यावी.

(नामांकित योजनेंतर्गत प्रवेशित विद्यार्थी कमाल ५० टक्के योजने व्यतिरिक्त प्रवेशित इतर विद्यार्थी किमान ५० टक्के)

२. ज्या नामांकित संस्थेत भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यास प्रवेश देण्यात येणार आहे, त्या संस्थेबरोबर संबंधित सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांनी करारनामा करावा. सदर करारामध्ये नामांकित योजनेंतर्गत भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात आलेल्या वर्गापासून इयत्ता १२ वी पर्यंत त्यांचे शिक्षण, निवास,सुरक्षा,आरोग्य, आहार व अन्यविहित सोयी सुविधा पुरविण्याबाबत व स्वतंत्र वर्ग न करण्याबाबत बाबींचा समावेश करण्यात यावा. तसेच नामांकित योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या सर्व नामांकित शाळांचे प्रत्येक वर्षी नवीन शैक्षणिक वर्ष सुरु होण्यापूर्वी योजनेकरिता विकसित करण्यात येणाऱ्या ऑनलाईन प्रणालीवर गुणांकन करण्यात येईल व आवश्यक विहित शैक्षणिक व निवासी सोयी सुविधा यामध्ये निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांमध्ये त्रुटी आढळून आल्यास किंवा विहित गुणांकनानुसार शाळा “अपात्र” ठरल्यास संबंधित शाळेची नामांकित योजनेंतर्गतची मान्यता रद्द करुन प्रवेशित करण्यात आलेल्या भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थी इतरत्र समायोजित करण्यात येतील. याचा देखील करारनाम्यात समावेश असावा.

३. नामांकित योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शाळांमार्फत बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा अधिकार, अधिनियम, २००९ व त्यांअंतर्गत केलेले व केले जाणारे सर्व नियमांची / तरतुदींची तसेच इयत्ता १ ली मध्ये शाळा प्रवेशासाठी बालकाच्या किमान वयाबाबत शिक्षण विभागाने निश्चित केलेल्या तरतुदींचे पालन करणे आवश्यक आहे.

४. सदर योजनेची अंमलबजावणी संबंधित जिल्हयाचे सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग करतील तसेच प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण या योजनेचे“पर्यवेक्षकीय अधिकारी” म्हणून व संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे हे “नियंत्रक अधिकारी” म्हणून जबाबदारी पार पाडतील.

५. सदर योजनेसाठी होणारा खर्च “मागणी क्र. झेडजी-३,२२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण (२) (२२) धनगर समाजातील विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमांच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे (कार्यक्रम) ३४, शिष्यवृत्त्या/ विद्यावेतने, (२२२५एफ४०५)’ या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या आर्थिक अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 202403161924572734 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH ROHIDAS CHAVAN

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C2377ED235498603821D49922A210871FF6FB9B369722AC707AEE7DCD87F2BD, cn=DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2024.03.16 19:34:19 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. प्र.स. (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे स्वीय सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक विभाग) विभाग, लातूर
६. जिल्हाधिकारी, नांदेड
७. सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, नांदेड
८. शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड
९. मा.महालेखापाल १/२,(लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
११. अध्यक्ष/सचिव, जीवनज्योत सामाजिक संस्था, आष्टी (तांडा), ता. हदगाव, जि. नांदेड
१२. निवडनस्ती (योजना-२)